**जलसंपदा विभागाकडे उपलब्ध असलेले जलाशयाचे पृष्ठभाग व मोकळ्या जमिनींवर सौर ऊर्जा प्रकल्प उभारणीसंदर्भात मार्गदर्शक सूचना**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक: सौऊप्र-२०२३/प्र.क्र.१४६/जवि**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : १४. ८.२०२४

**पहा :** १. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शा.नि.क्र. अपाऊ २०२०/प्र.क्र.१३७/ऊर्जा-७, दि. ३१.१२.२०२०

२. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शा.नि.क्र. अपाऊ २०२०/प्र.क्र.१३७(अ)/ऊर्जा-७, दि. ११.०५.२०२२

३. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शा.नि.क्र. सौरप्र-२०२४/प्र.क्र.११/ऊर्जा-७, दि. १५.०३.२०२४

**परिपत्रक**

राज्यातील ऊर्जेची मागणी लक्षात घेता, नवीन व नवीकरणीय (अपारंपारीक) ऊर्जा स्त्रोतांच्या विकसनासाठी केंद्र तसेच राज्य शासन प्रोत्साहन देत आहे. केंद्र शासनाने या ऊर्जा स्त्रोतांपासून होणाऱ्या वीज निर्मितीचे अनन्य साधारण महत्व लक्षात घेता, देशात सन २०२२ पर्यंत १७५ गिगावॅट वीज निर्मितीचे उद्दिष्ट जाहीर केले आहे.त्यामध्ये १०० गिगावॅट सौर ऊर्जा निर्मितीचा समावेश होता.

केंद्र शासनाच्या सदर धोरणाच्या धर्तीवर ऊर्जा विभागाने संदर्भ क्र.१ रोजीच्या शासन निर्णयानुसार महाराष्ट्र राज्यासाठीचे अपारंपारिक ऊर्जा धोरण -२०२० जाहीर केले असून संदर्भ क्र.२ अन्वये याबाबतची एकत्रित कार्यपद्धती निश्चित केली आहे. तसेच राज्यातील सर्व उच्चदाब आणि अतिउच्चदाब उपसा जलसिंचन योजनांचे सौर ऊर्जीकरण करण्यासाठी शासनाने (ऊर्जा विभागाने) निर्णय घेतला आहे. या शासन निर्णयानुसार सौर ऊर्जा प्रकल्पांसाठी लागणारी आवश्यक जमीन जलसंपदा विभागाने महावितरण कंपनीस हस्तांतरीत करावयाची आहे.

२. केंद्र शासन पुरस्कृत उपक्रमांकडून जलाशयाच्या पृष्ठभागावरील तरंगते सौर ऊर्जा प्रकल्पांच्या सर्वेक्षण व अन्वेषणाचे प्रस्ताव शासनास प्राप्त होत असून, त्यांना याकरिता नियमानुसार परवानगी देण्यात येत आहे. तसेच जलसंपदा विभागाच्या मोकळ्या जागांवर व जलाशयांवर सौर ऊर्जा प्रकल्प आस्थापित करण्यासाठी विविध निमशासकीय संस्था तसेच खाजगी विकासक यांचे प्रस्तावही जलसंपदा विभागास प्राप्त झाले आहेत.

३. ऊर्जा विभागाने निर्गमित केलेल्या दि. १५.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयानुसार उपसा जलसिंचन योजनांचे सौर ऊर्जीकरण करुन त्याव्दारे उपसा जलसिंचन योजनांना विद्युतपुरवठा करुन जलसंपदा विभागाच्या अनुदानाचा भार शुन्यावर आणणेसाठी उभारण्यात येणा-या सौर ऊर्जा प्रकल्पांसाठी लागणारी आवश्यक जमीन विनामोबदला जलसंपदा विभागाने महावितरण कंपनीस हस्तांतरीत करावयाची आहे. सबब, ऊर्जा विभागाच्या प्रस्तूत दि. १५.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयांतर्गतचे उपसा जलसिंचन ऊर्जीकरण प्रकल्प वगळता उर्वरीत उपलब्ध जमीन / जलाशयावर प्रस्तावित सौर ऊर्जा प्रकल्प आस्थापित करण्यासाठी पाटबंधारे विकास महामंडळाकडून जमिनी / जलाशयांचे पृष्ठभाग उपलब्ध करणे शक्य असल्यास ते संबंधित महामंडळाकडून नियामक मंडळाच्या ठरावाद्वारे महामंडळाच्या /शासनाच्या प्रचलित नियमानुसार

भाडेपट्टीवर कराराद्वारे उपलब्ध करुन देणेबाबत कार्यवाही अपेक्षित आहे. याअनुषंगाने खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत.

**मार्गदर्शक सूचना :**

१.०. ऊर्जा विभागाच्या शासन निर्णय दि. १५.०३.२०२४ अंतर्गतचे उपसा जलसिंचन ऊर्जीकरण प्रकल्प वगळता उर्वरीत उपलब्ध जमीन / जलाशय यावरील प्रस्तावित सौर ऊर्जा प्रकल्पांसाठी ऊर्जा विभागाने प्रसृत केलेल्या अपारंपारिक ऊर्जा धोरण २०२० व त्याअनुषंगाने निर्गमित शासन निर्णय दि. ११.०५.२०२२ नुसारच्या कार्यपद्धती मधील सर्व अटी व शर्ती लागू राहतील. तसेच सौर ऊर्जा प्रकल्पांबाबत ऊर्जा विभागामार्फत वेळोवेळी घेण्यात येणारे निर्णय/ मार्गदर्शक सूचना/ सुधारणा लागू राहतील.

२.० सदर सौर ऊर्जा प्रकल्प हे केंद्र / राज्य शासनाच्या ऊर्जा व नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्रालय तसेच त्या अंतर्गत विविध संस्था यांच्या मार्गदर्शक सूचनांचे पालन करुन विकसित करण्यात यावेत.

३.० जमिनीवरील सौर ऊर्जा प्रकल्प व त्यांचे कळयंत्र आवार तसेच तरंगते सौर ऊर्जा प्रकल्पांच्या पुलिंग स्टेशनसाठी लागणारी जमीन ज्या पाटबंधारे विकास महामंडळाच्या अखत्यारित येत आहे त्या महामंडळाने सदर जागा उपलब्धते बाबतचा ठराव नियामक मंडळात पारित करावा. सदर प्रकल्पांना महामंडळाकडील मोकळया जागेचे मूल्य प्रचलित शासकीय नियमानुसार परिगणीत करुन त्यावर Marginal Cost of Funds based Lending Rate (MCLR) प्रमाणे वार्षिक भाडेपट्टी निश्चित करुन भाडेतत्वावर देण्यात याव्यात. तथापि शासनाने ज्या जमिनी विशिष्ठ वापराकरिता आवंटीत केल्याची अट नमूद केली असेल, अशा जमिनी सक्षम प्राधिकाऱ्याच्या मंजूरीने उपलब्ध करुन द्याव्यात.

४.० जलाशयांचे पृष्ठभागावरील तरंगत्या सौर ऊर्जा प्रकल्पांसाठी प्रकल्पातून होणा-या वीजनिर्मितीच्या ०.०५ रुपये प्रति युनिट या दराने (सन २०२२-२३ हे आर्थिक वर्ष आधारभूत धरता ) व त्यानंतरच्या प्रत्येक आर्थिक वर्षासाठी ५% प्रमाणे चक्रवाढ पध्दतीने वाढ करुन भाडेपट्टी आकारण्यात यावी.

५.० जमिनीवरील अथवा जलाशयाच्या पृष्ठभागावरील सौर ऊर्जा प्रकल्पाकरिता भाडेपट्टी कराराचा कालावधी २५ वर्षे इतका राहील.

६.० करार कालावधी संपुष्टात आल्यानंतर प्रचलित शासकीय नियमानुसार भाडेकराराचे नुतनीकरण करण्याची मुभा संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाला राहील. भाडेकराराचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर प्रवर्तकांकडून जागा परत हस्तांतरीत करुन घेण्याची जबाबदारी ही संबंधित महामंडळाची असेल.

७.० विकासकाने महामंडळास देय रक्कम विहीत कालावधीत अदा न केल्यास महामंडळाच्या प्रचलित नियमानुसार त्यांच्यावर दंडात्मक / इतर नियमानुसार कार्यवाही करण्याचे अधिकार संबंधित महामंडळास असतील.

८.० सदर प्रकल्पांतून होणारी वीज निर्मिती तसेच वीज विक्री दर याबाबींची जबाबदारी प्रवर्तकाची राहील. तसेच वीज निर्मितीतील हानी व इतर नुकसानी साठी जलसंपदा विभाग/ महामंडळ कोणतीही भरपाई देण्यास बांधिल असणार नाही.

९.० सौर उर्जा प्रकल्पासाठीच्या सर्व आवश्यक मान्यता घेण्याची जबाबदारी प्रर्वतकाची राहील.

१०.० सौर प्रकल्पाची जोड सह:स्थित लहान जलविद्युत अथवा उदंचन जलविद्युत प्रकल्पांसमवेत करुन संकरित प्रकल्प उभारल्यास त्यास लहान जलविद्युत प्रकल्प अथवा उदंचन जलविद्युत प्रकल्पासाठीचे धोरण लागू राहील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०२४०८१४१२४४१४३९२७ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AMRUTA AJIT INAMDAR

Digitally signed by AMRUTA AJIT INAMDAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=970a1595c1174195bb66e7d7e826528118408f913b99e85fc47d3c5d3d5366de, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6F5FD13E252931098539336E1E4B5ACCE5E7F01F9C3FEABD54FBD95FAC86E18F, cn=AMRUTA AJIT INAMDAR
Date: 2024.08.14 12:59:52 +05'30'

**(अ.अ. इनामदार)**
**शासनाच्या अवर सचिव**

**प्रत :-**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.उपमुख्यमंत्री (जलसंपदा व ऊर्जा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) अप्पर मुख्य सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) अप्पर मुख्य सचिव (ऊर्जा) यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळ,जलसंपदा विभाग
१०) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
११) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
१२) जलविद्युत कार्यासन संग्रहार्थ.